पदोन्नती

कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांना उप अभियंता (विद्युत) पदावर पदोन्नती व पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०२२/प्र.क्र.४५/सेवा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २६/०४/२०२२

## शासन आदेश

सन २०२१-२२ च्या निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांना, उप अभियंता (विद्युत) (वेतन स्तर एस-२० ५६,१००-१,७७,६००) पदावर या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरूपात नियमित पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर संबंधितांची नियुक्ती त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांचे नांव, जात प्रवर्ग | वाटप केलेला महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | श्री. हेमंत कार्तिकस्वामी त्र्यंबके<br>अ.जा | कोकण-२ | अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ, सा. बां. विभाग, मुंबई यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) या पदावर |
| २. | श्री.विजय पा.मार्कंडेय<br>खुला | नागपूर | अधीक्षक अभियंता, नागपूर प्रादेशिक विद्युत मंडळ, सा. बां. विभाग, नागपूर यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) या पदावर |
| ३. | श्री. लक्ष्मण वामन शेलार<br>भ.ज.(ब) | नाशिक | नंदूरबार विद्युत उप विभाग |
| ४. | श्री.जितेंद्र भास्कर बागुल<br>इ.मा.व. | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) पदावर |
| ५. | श्री.दिलीप राजाराम पवार<br>खुला | कोकण-२<br>(चक्रा-१) | मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां. विभाग, मुंबई यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) या पदावर |
| ६. | श्री. राजकुमार वा.बाणाईत<br>खुला | नागपूर | नागपूर विद्युत उप विभाग क्र. २ |
| ७. | श्री. मनोज विठ्ठल सांगळे<br>भ.ज.(ड) | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) पदावर |
| ८. | श्री.नितीन रा. शिंदे<br>भ.ज.(ब) | पुणे | श्री. शिंदे यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यत येतील |
| ९. | श्री.विठ्ठल ना.दारव्हेकर<br>इ.मा.व. | अमरावती | अकोला विद्युत उप विभाग |

| **अ.क्र.** | **कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांचे नांव, जात प्रवर्ग** | **वाटप केलेला महसुली विभाग** | **पदस्थापना** |
|---|---|---|---|
| १०. | श्री.वि.ना.गौरकर<br>इ.मा.व. | अमरावती | बुलडाणा विद्युत उप विभाग |
| ११. | श्री. महादेव वि. हेरोडे<br>अ.जा | नागपूर | गडचिरोली विद्युत उप विभाग |
| १२. | श्री.रविशंकर मा.सुर्यवंशी<br>इ.मा.व. | कोकण-२ | ठाणे विद्युत उप विभाग |
| १३. | श्री. राजेंद्र द.नरवडे<br>अ.जा. | कोकण-२<br>(चक्रा-२) | भोंगा विद्युत उप विभाग |
| १४. | श्री.गोविंद नि. कुकडे<br>भ.ज.(क) | कोकण-२ | वांद्रे विद्युत उप विभाग |
| १५. | श्री. संजय बाबासाहेब डोंगरे<br>खुला (दिव्यांग प्रवर्ग) | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांचे कार्यालयातील उप अभियंता (विद्युत) पदावर |

२. उपरोक्त तक्त्यातील अनु. क्र. ८ येथील श्री. नितीन रा. शिंदे यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. उपरोक्त तक्त्यातील अनु. क्र. १५ येथील श्री. संजय बाबासाहेब डोंगरे यांना दिव्यांग प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे.

४. उपरोक्त कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांना पुढील अटींच्या अधिन राहून उप अभियंता (विद्युत) या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे:-

(१) सदर पदोन्नती आदेश मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दिनांक २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६-ब कार्यासनाच्या दिनांक ०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार करण्यात येत आहे. तसेच, दिनांक ०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सदर पदोन्नती करण्यात येत आहे.

(२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(३) सदर पदोन्नती आदेशातील जे अधिकारी पदोन्नती नाकारतील त्यांच्याबाबतीत सा.प्र.वि., शासन निर्णय दि.१२.९.२०१६ नुसार कार्यवाही करण्यात येईल.

५. उपरोक्त नमूद अभियंत्यांविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याच्या विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास त्यांच्याबाबतीत हे आदेश आपोआप रद्द होतील.

६. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे नियुक्त असलेल्या कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांना सदर पदोन्नतीच्या आदेशानुसार तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

७. संबंधित कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांनी पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रूजू व्हावे, अन्यथा सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.१४.७.२०२१ नुसार संबंधित कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

८. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना कळविण्यात येते की, पदोन्नत अभियंते १ महिन्याच्या आत रुजू न झाल्यास परि. ७ मध्ये नमूद केल्यानुसार शासन स्तरावर पुढील कार्यवाही करण्यासाठी अशा अधिकाऱ्यांची नावे शासनास कळवावीत.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२६११५७२२३३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL SWATI SACHIN

Digitally signed by PATIL SWATI SACHIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41A9218232BBAEA65861213D86D108EA7C48905DA5F33DBA9C8F6662CB8F9E18, cn=PATIL SWATI SACHIN
Date: 2022.04.26 11:58:59 +05'30'

**( स्वाती पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. मुख्य अभियंता ( विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार, नागपूर, औरंगाबाद, अकोला, बुलडाणा, गडचिरोली, ठाणे
६. सर्व कनिष्ठ अभियंता ( विद्युत) यांना मुख्य अभियंता ( विद्युत), सा.बां.विभाग यांचे मार्फत.
७. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन प्रशा-२,सेवा-१,सेवा-३,आस्थापना-१/३,सेवा-६,संगणक कक्ष,सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.